श्री

# मृदंगवादन.



कैलासवासी

रा. रा. विश्वनाथ रामचंद्र काळे वकील

यांनीं तयार केलें

त्याची द्वितीयावृत्ति

मुंबईंत

"गणपत कृष्णाजी" यांच्या छापखान्यांत छापिली.

शके. १८२१ सन १८९९.



किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.

## ( आवृत्ति पहिली. )

संगीतशास्त्राचा जसा उत्कर्ष व्हावा व जशी लोकांस अभिरुचि लागावी तशी जरी अद्यापि दृष्टोत्पत्तीस येत नाहीं, तरी विद्वान लोकांमध्यें ह्या शास्त्राची इतर शास्त्रांहून कमी योग्यता आहे असें नाहीं. आतां संगीताच्या अनभ्युदयास राजाश्रय नाहीं, लोक द्रव्यहीन होत चालले आहेत इत्यादि अनेक कारणें आहेत. असें जरी आहे तथापि स्वभावतःच जी ही मनोहर कला ती लोकांस आपल्याकडे कशी आकर्षण करणार नाहीं? सांप्रतकाळीं सतारनामक वाद्याची लोकांस फारच गोडी लागत चालली आहे. पुष्कळ लोकांच्या मतें, गायन व वादन हें गुरुशिवाय ग्रंथाधारें कधींही शिकतां येणार नाहीं असें आहे. हें ह्मणणे सर्वथैव सत्य आहे असें नाहीं. कारण, **तंतुवाद्य** व **तंतुगायनप्रकाश** ह्या आमच्या दोन पुस्तकांच्या साहाय्यानें पुष्कळ लोक सतार वाजविण्यास शिकले आहेत असें आह्मांस अनेक विद्वान् लोकांकडून आलेल्या लेखांवरून व सदहू पुस्तकांच्या पहिल्या आवृत्तींच्या खपावरून अनुभवास आलें आहे. ह्यावरून पुष्कळ इतर वाद्येंही ग्रंथाधारें वाजवितां येतील असें वाटणें हें साहजिक आहे. गायनाचाही प्रकार असाच आहे; ह्मणजे विपुल द्रव्य खर्चून अनेक गायनकलाप्रवीण लोकांस पदरीं बाळगून व इतर वि-

द्वान् लोकांसही आश्रय देऊन कोणी राजानें अथवा को-ट्याधीश सावकारानें मनावर घेतल्यास इंग्रजी गायनाप्रमाणें आपलें गायनही लेखनद्वारा लोकांपुढें आणतां येईल अशी आमची तर आमच्या **गायनाब्धिसेतु** नामक पुस्तका-वरून खात्री आहे.

आमच्या पूर्वोक्त दोन पुस्तकांवरून अभ्यास करणारांस ह्मणजे सतार शिकणारांस तबल्याच्या ठेक्याचें फार अगत्य आहे, व त्याशिवाय पुष्कळ लोकांस तबला किंवा पखवा-ज वाजविण्याचा शोक असतो; परंतु सुशिक्षक नसल्यामुळें त्यांचा हा शोक पूर्ण होत नाहीं असें जाणून हें **मन्मया**-सानें "**मृदंगवादन**" पुस्तक तयार केलें आहे. ह्याचाही उपयोग लोकांस सतारीच्या पुस्तकांप्रमाणें होईल अशी आशा आहे यांत काय विषय आहे, हें येथें सांगणें नलगे. पुस्तकावलोकनानें समजेल.

ज्याच्या कृपेनें हा प्रयत्न शेवटास गेला, त्या परम कृपाळु परमेश्वरापुढें मी सदा नम्र आहे.

## आवृत्ति दुसरी.

वरील पुस्तकाची प्रथमावृत्ति संपून बरेच दिवस झाले, व कांहीं विशेष अडचणींमुळें द्वितियावृत्ति छापण्याचा आज-पर्यंत योग जुळून आला नाहीं. तथापि वडिलांच्या कृपेनें आह्मांस ह्या कलेंत जें कांहीं अल्पज्ञान मिळालें आहे, त्याप्रमाणें प्रथमावृत्तींत थोडासा फरक करून व कांहीं न-वीन माहिती घालून; द्वितियावृत्ति छापविली आहे. ती

लोकादरास प्राप्त होईल आशी अशा आहे. वर्तमानपत्रांत जाहिरात दिल्याप्रमाणें पुस्तकें बरेच दिवसांपूर्वीं छापून तयार व्हावयास पाहिजे होतीं; परंतु मुंबई मुक्कामीं प्लेग वाढल्यामुळें व आमचें राहणें ह्या प्रांतीं असल्यामुळें पुस्तकें छापून तयार होण्यास पुष्कळ दिवस लागले, याजबद्दल. आश्रयदाते क्षमा करतील अशी आशा आहे.

हें पुस्तक मुंबईत हर्डीकर आणि कंपनी ४३८ ठाकुरद्वार पालवारोड, यांचे दुकानीं, बाळकृष्ण लक्ष्मण पाठक बुकसेलर व झांशी येथें मालकाकडे मिळेल.

झांशी ता. १ दिसेंबर १८९९ { भिकाजी विश्वनाथ काळे.<br>लोकोऑफिस इं. मि. रेलवे.



# अनुक्रमणिका.

पृ०

## प्रकरण १ लें.



## प्रकरण २ रें.



## प्रकरण ३ रें.

## प्रकरण ४ थें.



## गतीच्यापुढें वाजविण्याचे बोल.

पखवाज्याचें खोड.

आकृती १ ली.



कातड्यानें मढविलेलें तोंड.

आकृती २ री.



शाई घातलेलें तोंड.

आकृती ४ थी.



पखवाज वादीनें मढवून गट्टे घातलेला

आ० ३ री.



पहिल्या प्रकारची थाप.

आ० ६ वी.



बाह्या तबला

आकृती ५ वी.



दोन्ही बोटें उचलून घेतलीं आहेत.

अनामिका किनाऱ्यावर टेकून

आ० ७ वी.



सर्व हाताचा प्रहार करून करां-गली कडील बाजू अर्ध्या शाईव-रटेकलेली आहे.

आ० ८ वी.



नर्जनीचें बोट लवकर उचलावे

आ० ९ वी.




तीन्ही बोटें उचलूं नयेत

आ० १० वी




तीन्ही बोटें शाईवर मारून उच-लून घ्यावी.

आ० ११ वी




अनामिका किनाऱ्यावर टेकून त-र्जनीचा शाई आणि किनारें या-च्या मध्ये प्रहार.

आ० १२ वी.




तीन्ही बोटां पैकीं एक शाईं भा-गावी.

आ० १३ वी.



चारी बोटांचा प्रहार दाबून करावा.

आ० २० वी.

क, ग.



चारी बोटांचा प्रहार करून बोटें उचलून घ्यावी.

आ० २१ वी.

ध.



डाव्या हाताचा प्रहार आ० २१ प्रमाणे करावा, त्याचबरोबर उजव्या हाताने तर्जनीचा प्रहार करावा

ध. धी.



आकृती २२ वी.

मनगट आणि बोटे या पोकळी मध्ये करंगळीचा भाग गढू द्यावा.



आकृती २३ वी

मधले बोट मारून उचलून घेतल्यावर लागलेच मनगट दाबावें

आ० २४ वी.

ध, धी.



दोन्ही बोटां पैकी पाहिजेल्या बोटाचा प्रहार करावा.

आ० २५ वी.

क, ग.



॥ श्रीशंकर प्रसन्न ॥

# मृदंगवादन.



## भाग पहिला.

## प्रकरण पहिलें.

**मृदंग** ( पखवाज ) हें वाद्य गायनाच्या बरोबर किंवा कोणत्याही वाद्याबरोबर वाजवितात.

मनुष्याच्या कंठांतून अनेक प्रकारचे स्वर निघून जे राग ऐकण्यांत येतात त्यांस **गायन** ह्मणतात. तसेंच वाद्यांतून जे स्वर निघतात त्यांस **वादन** ह्मणतात.

प्रथमतः रागाचे स्वर कंठांतून करणें ते 'आ' या वर्णाच्या उच्चारानें होतात, परंतु त्यांत कोणताही शब्द होत नाहीं. याकरितां संगीतशास्त्रांत सांगितलें आहे कीं, असे स्वर कंठांतून काढतांना मुख्यत्वें, 'अनंत हरि' या शब्दांचा उच्चार वारंवार करून राग गात जावा.

रागांचे स्वर गातांना कांहीं दीर्घ व कांहीं ऱ्हस्व स्वर येतात. ते दीर्घ स्वर किती लांबट ह्मणावे, व ऱ्हस्व स्वर किती आखूड ह्मणावें याचा नियम ह्मणजे वेळ सारखा र-

द्यावा, ह्मणून स्वर ह्मणण्याचे वेळेस, हातानें किंवा कांशाच्या दोन लहानशा वाट्या घेऊन त्यानें एकामागून एक असे सारख्या अंतरानें ठोके टाकीत जावे, यास **ताल** ह्मणतात.

तालाचा ठोका टाकणें तो, मनुष्याची नाडी उडत असते त्याबरोबर टाकावा. या ठोक्यास **एकमात्रा** ह्मणतात, असा साधारण नियम आहे.

असे स्वर ( अनंत हरि ) या उच्चारानें तालाच्या ठोक्याबरोबर सारखे ह्मणत गेलें ह्मणजे त्यास **आलाफ** ह्मणतात.

परंतु असे एकामागून एक सारखे ठोके टाकून ताल धरिल्यानें एकच प्रकारचा ताल वाजतो, तालाचा विस्तार होत नाहीं. ह्मणून तीन ठोक्यांचा एक, चार ठोक्यांचा एक, पांच ठोक्यांचा एक, असा एकेक ठोका चढवीत पुष्कळ प्रकारचे तालांचा विस्तार करून त्यास निरनिराळीं नांवें योजिलीं आहेत.

त्यांत मुख्य ताल सात आहेत. त्यांचीं नावें:–**धृताल, मठताल, रूपकताल, झंपाताल, त्रिपुटताल, आडताल** व **एकताल.**

या सात तालांस दक्षिण हिंदुस्थानाकडील लोक, **आडाचवताल, सुलफाक, रूपकताल** किंवा एक्का, **झंपाताल त्रिवट, आधा, तिताला** किंवा **तिलवाडा, चौताल** व **एकताल** असें ह्मणतात.

प्रत्येक तालास पांच जाती आहेत, ह्मणजे सात तालांपैकीं प्रत्येक ताल पांच तऱ्हांनीं ठोका टाकून धरितां येतो. त्या पांच जातींचीं नांवें:–**चतस्र, तिस्र, मिश्र, खंड** व **संकीर्ण** मिळून एकंदर पस्तीस ताल होतात.

पस्तीस तालांचें कोष्टक व मात्रांचीं चिन्हें ( निशाण्या ):—

| सात ताल. | पांच जाती. | | |
|---|---|---|---|
| | चतस्र. | तिस्र. मिश्र. खंड. | संकीर्ण. |
| ध्रुवताल | ।०।। | ९ ९९९ ९९ ९ ९९<br>०००००००० ।०००<br>।।।। ।। | ९९ ९<br>ऽऽऽऽ |
| मठताल | ।०। | ९ ९९ ९ ९ ९<br>०००००० ।०।<br>। । | ९ ९<br>ऽ ० ऽ |
| रूपकताल | ०। | ९ ९ ९<br>०० ०० ० ।<br>। | ९ ९<br>० ऽ |
| झंपाताल | ।।० | ९ ९९ ९ ९ ९<br>०००००० । ००<br>।। । | ९ ९<br>ऽ ० ० |
| त्रिपुटताल | ०।० | ९ ९<br>००० ००० ०००<br>। । | ९<br>००ऽ |
| आडताल | ।।०० | ९ ९ ९९ ९९<br>०००० ००० ००००<br>।। ।। | ९९<br>ऽऽ०० |
| एकताल | । | ९ ९ ९<br>० । ०<br>। | ऽ |

वरील खुणा ह्या मात्रांच्या निशाण्या आहेत. मात्रानियम ह्मणजे तोंडानें अंक मोजून हातानें ठोका टाकणें.

वरील पस्तीस तालांत ज्या खुणा लिहिल्या आहेत त्या प्रमाणें तोंडानें अंक मोजून हातानें ताल धरीत गेलें ह्मणजे सुलभ रीतीनें तालाची माहिती होईल.

निरोगी मनुष्याच्या नाडीच्या ठोक्याबरोबर एक **मात्रा** गणतात. परंतु ताल जलद धरावयाचा असल्यास इतक्याच अवकाशांत दोन किंवा चार मात्राही होतात, मात्रा सोळा आहेत. त्याचें तपशीलवार कोष्टकः—

| मात्रांचीं नांवें. | संज्ञार्थ चिन्हें. | मात्रांची संख्या. |
|---|---|---|
| **अनद्रुत किंवा विराम** | ◡ | एक मात्रा. |
| **द्रुत** | ० | दोन मात्रा. |
| **द्रुतविराम** | ० | तीन मात्रा. |
| **लघु** | । | चार मात्रा. |
| **लघुविराम** | । | पांच मात्रा. |
| **लघुद्रुत** | । | साहा मात्रा. |
| **लघुद्रुतविराम** | । | सात मात्रा. |
| **गुरु** | S | आठ मात्रा. |
| **गुरुविराम** | S | नऊ मात्रा. |
| **गुरुद्रुत** | S | दाहा मात्रा. |
| **गुरुद्रुतविराम** | S | अकरा मात्रा. |
| **प्लुत** | ऌ | बारा मात्रा. |
| **प्लुतविराम** | ऌ | तेरा मात्रा. |
| **प्लुतद्रुत** | ऌ | चौदा मात्रा. |
| **प्लुतद्रुतविराम** | ऌ | पंधरा मात्रा. |
| **काकपद** | + | सोळा मात्रा. |

वरील मात्रांच्या खुणा पाहून हातानें ठोका ( टाळी ) वाजवून मोजण्याची रीतिः—

**विराम**,—एक मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच हातानें ठोका वाजवावा.

**द्रुत**,—दोन मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच हातानें ठोका वाजवून लागलेंच ' दोन ' असें ह्मणावें.

**द्रुतविराम**,—तीन मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच ठोका वाजवून लागलेंच ' दोन, तीन ' असें ह्मणावें.

**लघु**,—चार मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच हातानें ठोका वाजवून लागलेंच ' दोन, तीन, चार ' असें ह्मणावें.

**लघुविराम**,—पांच मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच ठोका वाजवून लागलेंच ' दोन, तीन, चार, पांच ' असें ह्मणावें.

याचप्रमाणें एकेक अंक चढवीत जाऊन सोळाही मात्रा मोजाव्या. पहिले अंकाला मात्र ठोका वाजवून बाकीचे सोळापर्यंत अंक नुस्ते तोंडानें ह्मणावे.

' एक ' या शब्दावर जो ठोका पडतो त्या ' ए ' आणि ' क ' या दोन अक्षरांपैकीं ' ए ' या अक्षरावर ठोका टाकीत जावें.

वर पस्तीस तालांचे कोष्टकांत मात्रांच्या खुणांनीं ताल दर्शविले आहेत; त्यांत प्रत्येक ताल त्या खुणांवरून हातानें ठोके टाकून कसा धरावा याविषयीं दोन तालांचा अर्थ खालीं लिहिला आहे.

# रूपकताल.

## रूपकतालाच्या निशाण्या.

रूपकतालास तीन ठोक्यांचा ताल ह्मणतात. याच्या दोन निशाण्या आहेत; द्रुत व लघु. याचे दोन ठोके सारख्या अंतरानें मारून, तिसऱ्या ठोक्याचा वेळ ठोक्याशिवाय जाऊं द्यावा, कारण **द्रुत** ह्मणजे दोन मात्रा आणि एक ठोका पडतो, व **लघु** ह्मणजे चार मात्रा, परंतु ठोका एकच पडतो. तेव्हां दोन आणि चार अशा मात्रा साहा मिळून ठोके दोनच पडतात ते असेः-' एक दोन ' ' एक दोन तीन चार ' असे पुनः पुनः अंक मोजीत जाऊन ' ए ' या अक्षरावर ठोके मारीत गेलें ह्मणजे **रूपकताल** होतो.

असे साहा अंक मोजीत गेलें ह्मणजे त्यास एक **आवर्त** ह्मणतात.

ज्या अक्षराबरोबर तालाचा ठोका पडावयाचा असतो त्या अक्षराखालीं— अशी आडव्या रेघेची निशाणी असते.

**रूपकताल**, हा तीन ठोक्यांचा असून ठोके तर दोनच टाकावे असें लिहिलें आहे, .याचें कारण असें की, जर या तीन ठोक्यांच्या तालाच्या तीन निशाण्या केल्या असत्या तर तिन्ही ठोके सारखे ' एक दोन, एक दोन, एक दोन,' असे वरचेवर पडत गेले असते, मग हा तीन ठोक्यांचा ताल आहे असें समजतां आलें नसतें. याजकरितां **द्रुत** आणि **लघु** अशा दोन निशाण्यांची योजना केली आहे.

यांत दोन ठोके सारखे वाजवून तिसऱ्या ठोक्याचा अवकाश सोडावा ह्मणजे हा तीन ठोक्यांचा ताल आहे असें समजतें.

कोणताही ताल कितीही ठोक्यांचा असला, तरी त्यांत कांहीं ठोक्यांचा अवकाश जाऊं दिल्याखेरीज अमुक ठोक्यांचा ताल आहे हें समजण्यांत येणार नाहीं. जो अवकाश सोडणें तो ठोका गणला पाहिजे. विसावा देणें हें अमुक ताल आहे असें समजण्याची खूण आहे.

जितक्या ठोक्यांचा ताल असेल तितके ठोके विसाव्या सुद्धां धरीत गेलें ह्मणजे त्यास एक **आवर्त** ह्मणतात.

## चतस्रजातीचा त्रिपुट.

याच्या खुणा तीन आहेत, ( ० ० । ) या तालास चार ठोक्यांचा ताल असें ह्मणतात. याचे तीन ठोके सारख्या अंतरानें वाजवून एका पुऱ्या ठोक्याचा अवकाश जाऊं द्यावा. ह्मणजे एक आवर्त पुरें झालें असें समजावें. असें पुनः पुनः तीन ठोके वाजवून विसावा सोडीत गेलें ह्मणजे या तालास चतस्रजातीचा त्रिपुट ह्मणतात. यासच दक्षिण हिंदुस्थानाकडील लोक त्रिवट ह्मणतात. आणि या तालाची सम तीन ठोक्यांपैकीं मधल्या ठोक्यावर ठेवितात परंतु ती पाहिजे त्या ठोक्यावर ठेविली तरी चिंता नाहीं.

## सम ( अवसान ).

प्रत्येक तालाचें कोणत्या तरी एका ठोक्यावर मुख्य

स्थान ठेवितात व त्यावर गाणारा आणि मृदंग वाजविणारा या दोघांचा मिलाफ होतो. गाणारा जी चीज गात असतो, त्यांतील एखादें अक्षर मुख्य धरून तें अक्षर तालाच्या मुख्य ठोक्याबरोबर आणितो, आणि मृदंग वाजविणारा त्याच ठोक्याबरोबर मृदंगवादर थाप टाकितो, ह्मणजे ऐकणारे त्या ठिकाणीं मान डोलवितात. याच मुख्य ठिकाणास **सम** अथवा **अवसान** असें ह्मणतात.

---

# प्रकरण दुसरें.

तालाच्या बरोबर अनेक प्रकारचे ध्वनि निघावे आणि गाणाराचे स्वरांशीं मिळून स्वरांची भरती व्हावी, ह्मणून मृदंग या नांवाचें वाद्य योजिलें आहे. यास **विष्णुवाद्य** ह्मणतात व हल्लीं प्रचारांत **पखवाज** ह्मणतात.

## पखवाजाचें वर्णन.

पखवाज हा लांबट वर्तुलाकार लांकडाचा तुकडा सुमारें दाहा तसूपासून तीस तसूपर्यंत लांब व दोन्ही तोंडाला दाहा इंचापासून पंधरा इंचपर्यंत रुंद असून, मध्यभागीं त्याचा व्यास दोन्ही बाजूंच्या तोंडाहून दोन तीन इंच अधिक असतो, व आंतून इतका पोखरलेला असतो कीं, तें लांकुड अर्ध इंच जाडीचें बाकी ठेवितात. ( + पहा, आकृति १. )

+ या आकृत्या पुस्तकाचे शेवटीं दिल्या आहेत, त्यांकडे शिकणारांनीं पूर्ण लक्ष द्यावें.

याचें लांकूड शिसम, खैर, साग, हेदू, सोनचाफा इत्यादींतून बहुतकरून असतें.

पखवाजाची दोन्ही तोंडें कातड्यानें मढविलेलीं असतात. व दोन्ही तोंडांचे किनाऱ्यावर अर्ध इंच किंवा पाऊण इंच दुहेरी चामडें असतें. ( पहा, आकृति २. )

पखवाजाच्या दोन्ही तोंडांच्या कांठांबरोबर चामड्याच्या वादीचा वेठ वळून घातलेला असतो त्यास महाळ किंवा गजरा ह्मणतात. त्या गजऱ्याशीं तोंडाकडील कातडीं शिवलेलीं असतात. दोन्ही तोंडाच्या गजऱ्यांतून सभोंवतीं वादी ओवलेली असते व पखवाजाचे मध्यभागीं त्या वादींतून दीड इंच जाड व सुमारें तीन इंच लांब असे वर्तुळाकार लांकडाचे तुकडे बसविलेले असतात, त्यास गट्टे ह्मणतात. हे गट्टे खालीं व वर ठोकले ह्मणजे पखवाजाचा स्वर हवा तितका चढवितां व उतरतां येतो. ( पहा, आकृति ३. )

मृदंगाच्या एका तोंडाला मध्यभागीं दोन इंचपासून तीन इंचपर्यंत शाई घातलेली असते. ( पहा, आकृति ४. )

ही शाई लोहकीट ( लोखंडाची जळ ) बारीक करून गव्हांचे पिठाची चिकी करून त्यांत घोंटलेली असते. दुसऱ्या तोंडाला वाजविण्याचे वेळेस गव्हांचें पीठ भिजवून शाईप्रमाणें लावितात.

पखवाजाची दुसरी प्रत तबला; ह्मणजे. पखवाजाचेच दोन भाग निरनिराळे केलेले असतात. शाईकडचा भाग लां-

कडाचा असतो व दुसरा भाग लांकडाचा, मातीचा, तांब्याचा किंवा पितळेचा असतो त्यास वाजविण्याच्या वेळेस वर सांगितल्याप्रमाणें कणीक लावितात, यास **बाह्या** किंवा **डग्गा** ह्मणतात. ( पहा, आकृति ५. )

वाजविणारानें पखवाज आपल्यापुढें आडवा ठेवावा व उजव्या हाताकडे शाई घातलेली बाजू करावी.

तबला वाजविणारानें तबल्याचे दोन्ही भाग ( **तबला** व **डग्गा** ) आपल्यापुढें उभे ठेवावे. शाईचा भाग उजव्या हाताकडे व कणकेचा भाग डाव्या हताकडेस घ्यावा.

पखवाजाचें वाजविणें तबल्यावर व तबल्याचें वाजविणें पखवाजावर होतें.

---

# प्रकरण तिसरें.

## पखवाजाचे बोल.

पखवाजाचे दोन्ही तोंडावर दोन्ही हातांनीं बरोबर किंवा वेगवेगळे प्रहार केल्यानें जो ध्वनि होतो त्यास **बोल** ह्मणतात.

उजव्या हाताचीं बोटें व तळहात शाईकडील बाजूस ठिकठिकाणीं लागून निरनिराळे बोल होतात; तसेच डाव्या हाताचेही होतात.

### बोटांचे अर्थ.

**१ अंगुष्ठ ह्मणजे अंगठा, २ तर्जनी ह्मणजे अंगठ्याचे**

शेजारचें बोट, ३ मध्यमिका ह्म० मधलें बोट, ४ अनामिका ह्म० करांगुळी शेजारचें बोट, ५ कनिष्ठिका ह्म० करांगुळी.

## पखवाजावर थापमारणें.

थाप तीन प्रकारची आहे. ती अशीः—

**प्रकार पहिला**—पखवाजाचे शाईकडील बाजूवर उजव्या हाताची तर्जनी, मध्यमांगुळी, अनामिका आणि कनिष्ठिका, ह्या चारी बोटांचा प्रहार किनाऱ्यापासून शाईचे कांहीं भागावर बोटें पोहोंचतील अशा बेतानें करून, तिन्ही बोटें झटकन् उचलून घेऊन कनिष्ठिकेचें शेवट शाईचे किनाऱ्यावर टेकलेलें असावें. ( पहा, आकृति ६. )

**प्रकार दुसरा**—पखवाजाचे किनाऱ्यावर जें दुहेरी चामडें असतें, त्याजवर अनामिका ठेवून तर्जनी आणि मध्यमांगुळी या दोन बोटांचा प्रहार शाईवर करून तीं बोटें झटकन् उचलून घ्यावीं. ( पहा, आकृति ७. )

**प्रकार तिसरा**—चारी बोटें व तळहात पखवाजाचे अर्ध्या तोंडावर ठेवून सारखा हात मारावा; तो असा—खालची अर्धी बाजू अर्ध्या शाईपर्यंत मोकळी ठेऊन हात मारून उचलून घ्यावा, परंतु तळहाताचा खालचा भाग ( करांगुळी कडील बाजू ) मागाहून उचलावी. हा प्रकार फार अवघड आहे. आकृती कडे पूर्ण लक्ष द्यावें. ( पहा, आकृति ८. )

## उजव्या हातानें वाजणारीं अक्षरें.

**ट, र, ड, ड़ान्, त, ता, नी, तुम्, दिम्, थुम्, न,**

म, त्रक, त्रान्, नङ, हीं उजव्या हातानें वाजणारीं अक्षरें आहेत.

ट, किंवा र, हीं दोन अक्षरें उजव्या हाताच्या तर्जनीनें शाईवर दाबून प्रहार करून वाजवावीं, ह्मणजे झटकन् उचलूं नयेत. ( पहा, आकृति ९. )

ड, मध्यमांगुली, अनामिका आणि कनिष्ठिका या तिन्ही बोटांचा प्रहार शाईवर दाबून करावा. ( पहा, आकृति १० )

डान्, मध्यमांगुली अनामिका आणि कनिष्ठिका या तिन्ही बोटांचा प्रहार शाईवर करून, तीं बोटें झटकन् उचलून घ्यावीं. ( पहा, आकृति ११. )

त ता, ती. हीं अक्षरें ड प्रमाणें ह्मणजे ( १० ) प्रमाणेंच वाजवावीं. परंतु एखादे वेळीं त, ता, किंवा ती, हीं अक्षरें वाजविण्याचे वेळीं अनामिका पखवाजाचे किनाऱ्यावर ठेवून, तर्जनीनें किनारा आणि शाई यांचे मध्यभागीं प्रहार करावा लागतो. ( पहा, आकृति १२. )

ता, हें अक्षर ज्या ठिकाणीं येईल त्या ठिकाणीं वर लिहिलेल्या तिन्ही थापांपैकीं कोणतीही एक थाप वाजवावी. तुन्न, तर्जनी शाईवर मारून उचलून घ्यावी. ( पहा, आकृति १३. )

न, किंवा म, अनामिका किनाऱ्यावर ठेवून तर्जनी किनाऱ्यावर मारावी. ( पहा, आकृति १४. )

त्र, मध्यमांगुली अनामिका आणि कनिष्ठिका हीं तिन्ही

बोटें शाईवर मारून लागलेंच तर्जनी हें बोट शाईवर त्यांचे पाठोपाठ मारावें. ( पहा, आकृती १५. )

परंतु त्र, याच्या शेजारींच जर **क** हें अक्षर आलें तर याचा उच्चार **त्रक्** असा होतो, तेव्हां **क** हें अक्षर डाव्या हातानें वाजविण्याचें आहे, परंतु जलद वाजविण्याचे वेळेस वर लिहिल्याप्रमाणें **त्र** हें अक्षर वाजवून मध्यमांगुली अनामिका आणि कनिष्ठिका ह्या तिन्ही बोटांचा प्रहार लागलाच ड अक्षराप्रमाणें करावा. अशा प्रकारचा एक **त्रक्** वाजवीत असतात. ( पहा, आकृती १६. )

**त्रान्**, मध्यमांगुली, अनामिका, व कनिष्ठिका हीं तिन्ही बोटें किनाऱ्यावर मारून लागलेंच तर्जनी हें बोट किनाऱ्यावर मारावें. ( पहा, आकृती १७. )

**दिन्न, थुन्न**. चारी बोटें व तळहातापैकीं कांहीं भाग अर्ध्या शाईवर पोंहोंचे, इतका सारखा मारून झट्कन् उचलून घ्यावा. ( पहा, आकृती १८. )

**नङ्**, तर्जनीच्या शेवटाचा प्रहार किनाऱ्यावर म्हणजे दुहेरी चामडें असतें त्याजवर करावा. ( पहा, आकृती १९. )

**न**, हें अक्षर ज्याप्रमाणें वाजवावें असें लिहिलें आहे, त्याप्रमाणेंच **न** वर्गांतील सर्व अक्षरें ( **न ना नी नू ने नौ नं नः** ) वाजवावीं.

त्याप्रमाणेंच जीं अक्षरें वर लिहिलीं आहेत त्या प्रत्येक अक्षराच्या वर्गांतील कोणतेंही अक्षर तोंडानें म्हणण्यांत आलें तरी वाजविण्यांत त्या वर्गाचें आद्य अक्षर लिहिलें आहे त्या

प्रमाणेंच सर्व अक्षरें वाजवावीं जेथें मुद्दाम एकाच वर्गांतील निरनिराळीं अक्षरें ( त, ता, ती ) अशी लिहिलीं आहेत, तीं मात्र निरनिराळ्या तऱ्हेनें वर सांगितल्याप्रमाणें वाजवावीं.

## डाव्या हातानें वाजणारीं अक्षरें.

**क, ग, घ,** हीं डाव्या हातानें वाजणारीं अक्षरें आहेत.

**क,** तर्जनी, मध्यमिका, अनामिका आणि कनिष्ठिका ह्या चारी बोटांचा प्रहार ज्या ठिकाणीं कणीक लाविलेली असते त्याजवर दाबून करावा. बोटें झटकन उचलून घेऊं नयेत. ( पहा, आ० २०. )

**ग,** या अक्षराचा प्रहार. ( आ० २० ) प्रमाणें करावा.

**घ,** तर्जनी, मध्यमिका, अनामिका व कनिष्ठिका या चारी बोटांचा प्रहार किनाऱ्यापासून कणकेपर्यंत करून बोटें झटकन उचलून घ्यावीं. ( पहा, आ० २१. )

## उजव्या आणि डाव्या हातांनीं एकदम वाजणारीं अक्षरें.

**ध, धा, धी, धूम्, धोम्,** हीं अक्षरें उजव्या व डाव्या हातांनीं एकदम वाजणारीं आहेत.

**ध, धी,** डाव्या हाताच्या चारी बोटांचा प्रहार बोटें किनाऱ्यापासून कणकेवर पोंहोंचत अशा बेतानें करून तीं उचलून घ्यावीं, आणि याचे बरोबरच उजव्या हाताची अनामिका किनाऱ्यावर ठेवून तर्जनीनें शाईवर प्रहार करून

तें बोट उचलून घ्यावें, हे दोन्ही हातांचे प्रहार एकदम झाले पाहिजेत. ( पहा, आ० २२. )

**धा**, या अक्षराचा प्रहार डाव्या हातानें ( आ० २२ ) यांत सांगितल्याप्रमाणें करावा आणि उजव्या हातानें तीन प्रकारच्या थापांपैकीं कोणती तरी एक थाप मारावी. हे दोन्ही प्रहार बरोबर झाले पाहिजेत.

गतीच्या वाजविण्याचे वेळेस **धा** हें अक्षर आलें तर पहिल्या व दुसऱ्या प्रकारच्या थापांपैकीं कोणतीही थाप मारावी. धृपदाचें वाजविणें असलें तर तिसऱ्या प्रकारची थाप मारावी.

**धूम; धाम**, डाव्या हाताचा प्रहार ( आ० २९ ) प्रमाणें करावा आणि उजव्या हाताचाही त्याचप्रमाणें ह्म० तर्जनी, मध्यमांगुलि, अनामिका आणि कनिष्ठिका ह्या चारी बोटांचा प्रहार अर्ध्या शाईवर पोहोंचेल अशा बेतानें करून बोटें झट्‌कन उचलून घ्यावीं.

पखवाजावर दुहेरी चामडें असतें त्या दुहेरी चामड्याच्या भागास किनारा ह्मणतात; व त्यास दुसरा शब्द चाटी असाही आहे.

ज्या ठिकाणीं किनाऱ्यावर प्रहार करावा ह्मणून सांगितलें आहे, तो प्रहार बोटानें करतेवेळेस दुहेरी चामड्याच्या पुढले कातड्यावर कांहीं बोटांचा भाग जातो, तथापि तो प्रहार किनाऱ्यावरच जाहला असें समजावें.

**दीं, थुं**, हे शब्द **दीन्न, थुन्न**, प्रमाणें वाजवावे,

हे वर लिहिलेले सर्व बोल हातानें चांगले वाजवितां येऊन ध्यानांत राहिल्या खेरीज शिकणारानें खालीं लिहिलेल्या गतींचा अभ्यास करूं नये.

---

# प्रकरण चवथें.

पखवाजाचे वाजविण्यांत दोन प्रकार आहेत. गतीचें वाजविणें व धृपदाचें वाजविणें. गतीचें वाजविणें ज्यास ठेक्याचें वाजविणें असेंही ह्मणतात, तें बहुतकरून तबल्यावर होतें; व धृपदाचें वाजविणें पखवाजावर होतें. धृपदाचे वाजविण्यांत उजव्या व डाव्या हातांचे जे वर बोल सांगितले आहेत त्याप्रमाणें वाजवावें, परंतु जे वर थापेचे तीन प्रकार सांगितले आहेत त्यांतील तिसऱ्या प्रकारचे थापेचा उपयोग बहुतकरून करावा.

गतीचे वाजिवण्याचे वेळेस डाव्या हातानें जे बोल वाजविण्यांत येतात, त्यांत डाव्या हाताच्या पंज्यामध्यें पोकळी ठेवून वाजवितात; ह्मणजे पखवाजाचे डाव्या हाताकडील बाजूचे किनाऱ्यावर जें दुहेरी चामडें असतें, त्याचे पुढें व कणकेचे अलिकडेस डाव्या हाताचें मणगट ठेवून कणकेचे बाहेर आणि पलिकडील किनाऱ्याचे आंत तर्जनी, मध्यमिका आणि अनामिका या तीन बोटांचे शेवटांचा प्रहार करावा लागतो. ( पहा, आ० २३. )

त्यांत ज्या ज्या ठिकाणीं बोटांचा प्रहार करून झट्कन्

उचलून घ्यावीं ह्मणून वर सांगितलें आहे त्या त्या ठिकाणीं मध्यमांगुलीचे शेवटाचा प्रहार पंज्यांत पोकळी ठेवून करावा, आणि ज्या ठिकाणीं मणगट टेकलें असतें त्या ठिकाणीं कातडें दाबावें. ( पहा, आ० २४. )

ज्या ज्या ठिकाणीं डाव्या हाताचीं बोटें मारून झट्‌कन्‌ उचलूं नये असें सांगितलें आहे, त्या त्या ठिकाणीं डाव्या हाताचे तिन्ही बोटांच्या शेवटांचा प्रहार करावा व झट्‌कन्‌ उचलूं नयेत. ( पहा, आ० २५. ) किंवा तिन्ही बोटांपैकीं कोणत्याही बोटाचा प्रहार केला तरी चिंता नाहीं.

पुढें दिलेल्या निरनिराळ्या तालांतील गती तबल्यावर अथवा पखवाजावर बसविण्याचे पूर्वीं त्या, तोंडानें ह्मणून व हातानें ताल धरून चांगल्या रीतीनें पाठ कराव्या, ह्मणजे त्या तबल्यावर अथवा पखवाजावर बसविण्यास सुलभ जातील.

## चतस्र जातीचे त्रिपुटतालाच्या गती.

यास **तिताला**, **त्रिवट**, किंवा **आड्डा** ह्मणतात. याच्या गती पुष्कळ प्रकारच्या आहेत त्या अशाः—

### ताल त्रिवट ( ठाय ) गत १ ली. मात्रा १६.

१ २ ३ ४

१/४ १/४ १/४ १/४

**ना धी धी ना, ना धी धी ना, ना ती ती ना, ना धी धी ना,**

१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १० ११ १२ १३ १४ १५ १६

या गतींतील अक्षरें सम विषम नसून सगळीं एकाच वजनाचीं असल्यामुळें प्रत्येक अक्षराखालीं एकेक मात्रा याप्रमाणें गतींतील सर्व अक्षरें मिळून १६ मात्रा, अक्षरांखालीं दिलेल्या आंकड्यांनीं दर्शविल्या आहेत; तसेंच चार अक्षरें मिळून होणारा एकेक चतुर्थांश कंसांत निराळा दाखविला आहे. हे चारी चतुर्थांश मिळून पूर्ण गत होते; व यासच एक आवर्त ह्मणतात.

वरील गतींतील अक्षरांखालीं दिलेले १६ आंकडे तोंडानें एकसारख्या अवकाशानें ह्मणत हातानें प्रत्येक आंकड्याबरोबर हळूहळू ठोके वाजवावे. व ज्या आंकड्यांखालीं आडव्या रेघा दिल्या आहेत त्या तालाच्या निशाण्या असल्यामुळें त्याजवर मोठ्यानें ठोका वाजवावा.

१ ल्या, ५ व्या व १३ व्या आंकड्याखालीं आडव्या रेघा असून ९ व्या आंकड्याखालीं शून्य दिलें आहे. या गतीची सम १ ल्या अक्षरावर असल्यामुळें त्याचे खालीं* दोन रेघा दिल्या आहेत. व काल ९ व्या अक्षरावर असल्यामुळें त्याचे खालीं शून्य दिलें आहे. या अक्षरावर ठोका न मारतां अवकाश जाऊं द्यावा.

या प्रमाणें १६ आंकडे सारख्या अवकाशानें हातानें

---

* याच प्रमाणें पुढील सर्व गतींतील समेच्या अक्षरांखालीं आडव्या दोन रेघा दिल्या आहेत.

ताल धरून ह्मणतां येऊं लागलें ह्मणजे आंकड्यांचे जागीं गतींतील अक्षरें ह्मणण्याचा अभ्यास करावा. व गत चांगली पाठ ह्मणतां येऊं लागली ह्मणजे मागील प्रकरणांत प्रत्येक अक्षर वाजविण्याचा अर्थ लिहिला आहे त्या प्रमाणें अक्षरें हातानें वाजविण्याचा अभ्यास करावा. व गत चांगली वाजवितां येऊं लागली ह्मणजे तिजबरोबर ज्या अक्षरांखालीं तालाच्या ठोक्याच्या निशाण्या केल्या आहेत त्या अक्षरांवर पायानें ताल धरण्याची संवय करावी.

या गतीचीं अक्षरें तोंडानें ह्मणतांना कोणी **ना धिं धिं ना**, ह्मणजे धीवर अनुस्वार देऊन ह्मणतात, परंतु त्या पासून अक्षरें वाजविण्यांत किंवा दीर्घ ऱ्हस्व यांत फेरफार होत नाहीं.

## या गतीचा दुसरा पर्याय.

ज्या वेळेस हा ताल जलद धरितात त्या वेळेस ही गत फिरवून वाजवितात ह्मणजे या गतीच्या सोळा अक्षरांतील चार अक्षरें कमी करितात. तीं अशीं:—

{ **ना धी धी ना** / १ २ ३ ४ } हीं चार अक्षरें मिळून गतीचा एक चतुर्थांश अथवा चार मात्रा होतात हें वर सांगितलेंच आहे, यां पैकीं १ लें अक्षर **ना** कमी करून बाकीचीं तीन अक्षरें **धी धी ना**, एवढींच वाजवितात. परंतु हें अक्षर कमी झाल्यानें चतुर्थांशांतील मात्रा कमी होत नाहीं. कारण ताल १६ मात्रांचाच आहे ह्मणून ती मात्रा ति-

सरें अक्षर धी यांत मिळवून तें दीर्घ ह्मणतात व त्याजवर अनुस्वार देतात. ह्मणजे धीं या अक्षराला दोन मात्रांचा
२
अवकाश द्यावा लागतो; ह्मणून एका मात्रेच्या अवकाशांत धी हें अक्षर ह्मणून, त्याचा अंत्य स्वर ( इन् ) यांत दुसरी मात्रा ह्मणावी. हें शिकणाराचे लक्षांत चांगलें यावें याकरितां त्या ( इं ) कारासह गत खालीं दिली आहे. ती अशीः—

धी धी ( इं ) ना, धी धी ( इं ) ना.
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८

ती ती ( इं ) ना, धी धी ( इं ) ना.
९ १० ११ १२ १३ १४ १५ १६

ह्या प्रमाणें ना धी धी ना, यांतील पहिलें अक्षर ना कमी करून त्याच्या एका मात्रेचा अवकाश, तिसरें अक्षर धी यांत कसा वाढला जातो हें चांगलें लक्षांत येण्याकरितां वरील गत दिली आहे; तरी तिची नीट समजूत पडली ह्मणजे खालील गत सहज शिकतां येईल.

( ताल त्रिवट ( दुगण ) गत २ री. मात्रा १६.)

धी धीं ना. धी धीं ना, ती तीं ना, धी धीं ना,
१ २ १ १ २ १ १ २ १ १ २ १

यांत ज्या धीवर व तीवर अनुस्वार आहे तीं अक्षरें दीर्घ वाजवावीं ह्मणजे, एका अक्षरामध्यें दोन अक्षरांचा वेळ जाऊं द्यावा. या गतीची सम पहिल्या धीवर आहे.

वर लिहिलल्या दोन्ही गती विशेषें करून तराणा, पदें, ठुंबरी, इत्यादि चिजांबरोबर वाजवितात.

## पंजाबी ठेका. ( मात्रा १६ )

त क्क धीं धा, त क्क धीं धा, त क्क तीं ता, त क्क धीं धा,
१ ॥ १ १॥ १ ॥ १ १॥ १ ॥ १ १॥ १ ॥ १ १॥

१ ॥ १ १ ॥

. त क्क धीं धा, हीं चार अक्षरें मिळून गतीचा एक चतुर्थांश होतो.

त, . एक मात्रा; यांत एक मात्रेचा अवकाश ठेवावा.

क्क, अर्धी मात्रा; त च्या निम्मे वेळांत क्क वाजवावा; ह्मणजे त्याच्या पुढचें अक्षर धीं हें क्क च्या पाठोपाठ वाजवावें

धीं, हें अक्षर एक मात्रेचें आहे. त च्या इतक्याच अवकाशांत वाजवावें.

धा, हें अक्षर त च्या दिढीनें दीर्घ आहे ह्मणून जितका वेळ तक्क या दोन अक्षरांस लागतो तितक्याच अवकाशांत धा हें दीड मात्रेचें अक्षर वाजवावें.

वर चतस्र जातीचा त्रिपुट ताल सांगितला आहे, त्या ठिकाणीं ह्या तालांत चार ठेके आणि आठ मात्रा आहेत असें सांगितलें आहे. परंतु या पंजाबी ठेक्यांत त क्क धीं धा
१ ॥ १ १ ॥

या चार अक्षरांत चार मात्रा होतात. आणि हा गतीचा

एक चतुर्थांश आहे. असे चार चतुर्थांश ह्मणजे एक पूर्णांक होतो, व ठेके चार होऊन मात्रा सोळा होतात. आतां आठ मात्रांच्या ऐवजीं येथें १६ मात्रा कां लिहिल्या अशी कोणी शंका घेईल. तर ज्या ज्या ठिकाणीं एक मात्रा गणली आहे त्या त्या ठिकाणीं अर्धी मात्रा अशा हिशोबानें मोजीत गेलें ह्मणजे सर्व गतीच्या मात्रा आठ होतील, परंतु अशानें गतींच्या कांहीं अक्षरांस पाव मात्रा व कांहीं अक्षरांस पाऊण मात्रा अशा येतात, यामुळें नवीन शिकणारांस अवकाश ठेवण्याच्या समजुतींत फार अडचण पडेल, ह्मणून दुप्पट मात्रा करून ताल दर्शविला आहे.

ज्या ठिकाणीं र्‍हस्व अक्षर वाजविण्यांत येईल त्या ठिकाणीं इतकाच नियम समजला पाहिजे कीं, त्या र्‍हस्व अक्षराच्या पुढच्या अक्षराचा आरंभ जलद करावा. यावरूनच तें पाठीमागचें अक्षर र्‍हस्व आहे असें समजतें. तोंडानें ह्मणण्यांत देखील तसाच प्रकार आहे.

जेव्हां दीर्घ अक्षर वाजवावें लागतें तेव्हां जें दीर्घ अक्षर असेल त्याच्या पुढच्या अक्षराचा आरंभ जलद न करितां जितक्या मात्रांचें तें अक्षर असेल तितक्या मात्रांचा अवकाश जाऊं देऊन नंतर करावा. याजवरूनच हें अक्षर दीर्घ आहे असें समजतें.

ही गत बहुतकरून पंजाबी ठुबऱ्यांबरोबर वाजवितात.

**त क धीं धा**, यांतील **धा**, हें अक्षर वाजवितांना उजव्या हाताची थाप मारावयाची, परंतु तसें न वाजवितां **न** अक्षराप्रमाणें किनाऱ्यावर तर्जनीनें प्रहार करितात, व **त**

क्क धी ना, असे बोलही तोंडानें ह्मणण्याचा सांप्रदाय आहे.

# ख्यालाची गत १ ली. ( मात्रा १६ )

## याम जलतिताला अथवा तिलवाड्याचा ठेका असेंही ह्मणतात.

१ २ १ २ २ १ २ १ २ २
धा धीं ऽ क्रि धा ऽ धी ऽ धा धीं ऽ की ता ऽ गी ऽ
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १०

या गतीचे दोन भाग कंसांमध्यें निरनिराळे दाखविले आहेत. प्रत्येक भागांत जरी अक्षरें पांच आहेत तरी मात्रा आठ आहेत ह्मणजे कांहीं अक्षरें दोन मात्रांचीं आहेत. हें शिकणारांचे ध्यानांत येण्यासाठीं त्या अक्षरांच्या अंत्यस्वरांसह गत खालीं लिहून आह्मी मात्रा स्पष्ट दाखविल्या आहेत.* याची समजूत झाली ह्मणजे वर लिहिलेली गत सहज ध्यानांत येईल.

१

१ २ ३ ४ ५
अक्षरें { धा धी ( इन् ) क्रि धा ( आ ) धीं ( इ )
मात्रा- { १ २ ३ ४ ५ ६ ७ ८

* याच प्रमाणें पुढील गतींत दोन अथवा अधिक मात्रांचीं अक्षरें आल्यास त्यांचा अंत्य स्वर तितक्या मात्रा पावेतो लांबवावा.

२

३/२

| | ६ | ७ | | ८ | ९ | | १० | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अक्षरं | धा | घो | ( इन् ) | कि | ता | ( आ ) | गी | ( इ ) |
| मात्रा- | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |

या गतीची सम पांचवें अक्षर धी याजवर आहे. पहिला व तिसरा हे ठोके धींवर न पडतां धीं आणि की यांच्या मधल्या अवकाशांत पडतात, इकडे शिकणारांनीं लक्ष्य द्यावें.

दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांत ख्याल ह्मणून एक प्रकारची कविता आहे. ती ह्मणतांना या गतीचा उपयोग होतो.

संस्कृत किंवा प्राकृत भाषा लिहिण्याच्या पद्धतीप्रमाणें धा हें अक्षर दीर्घच समजलें पाहिजे. परंतु पखवाजाचे बोल किंवा गतींचीं अक्षरें लिहिण्यांत हा नियम बिलकुल लागू नाहीं. कारण यांत कोणतें अक्षर कोणतेवेळीं न्हस्व होईल याचा नियम नाहीं.

## ख्यालाची गत दुसरी.

| ॥ ॥ | १ | ॥ ॥ | १ १ | १ | १ | १ |
|---|---|---|---|---|---|---|
| तृक | धा | घी | नाधी | धीं | धीं | धा |

| ॥ ॥ | १ | ॥ ॥ | १ १ | १ | १ | १ |
|---|---|---|---|---|---|---|
| तृक | धा | घो | नाधी | तीं | तीं | ता |

या गतीची सम सातव्या धा वर आहे.

# चतस्रजातीचा त्रिपुट.

कथेच्या आरंभाची, लावणीची व भजनाची गत.

१ १ १ १ १ १ ॥ ॥ ॥ ॥

धीं धीं ना तीं ना धीं ना गी तृ क

या गतीची सम पहिल्या धीं वर आहे.

# वरील गतीचा दुसरा पर्याय.

१ ॥ १ ॥ ॥ ॥ १ ॥ १ ॥ ॥ ॥

धीं न धीं ऽ द्धीं न क, तीं न धीं ऽ ध्धीं न क

या गतीच्या अक्षरांखालीं तालाच्या ठोक्यांच्या निशाण्या घातल्या आहेत, त्यांत समेचा ठोका पहिल्या धीं खालीं आला आहे; व काल्याचा ठोका तीं खालीं आला आहे. दुसरा आणि चवथा असे दोन ठोके धीं व द्धीं या दोन अक्षरांच्या मधल्या अवकाशांत आहेत ह्मणून तोंडानें ह्मणते वेळेस किंवा हातानें गत वाजविते वेळेस ह्या दोन अक्षरांच्या मधल्या अवकाशांत ठोके टाकवे.

# वरील गतीचा तिसरा पर्याय.

धीं न क त् ऽ धीं न क, धीं न क त् ऽ धीं न क.

या गतींत समेचा ठोका पहिल्या धींवर आहे. दुसरा व चवथा असे दोन ठोके त, व धी यांचे मधल्या अवकाशांत पडतात.

या गतींतील न् या अक्षराचा वाजविण्यांत उपयोग करूं नये, फक्त तोंडानें ह्मणतांना करावा. वाजविण्यांत उपयोग केला तर गतीमध्यें गडबड होऊन गत चांगली दिसत नाहीं.

## गत टप्पाची.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| धा | धीं | धा | धीं | हीं अक्षरें गतीचा एक चतुर्थांश होय. |
| १॥ | ॥ | १ | १ | |

या गतीची सम चवथें अक्षर धीं याचेवर आहे.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| धा | धीं | धा | धीं. | धा | धीं | धा | धीं, |
| १॥ | ॥ | १ | १ | १॥ | ॥ | १ | १ |
| | | | = | | | | — |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| ना | गी | ना | गीं | धा | धीं | धा | धीं |
| १॥ | ॥ | १ | १ | १॥ | ॥ | १ | १ |

गतीच्या अक्षरांखालीं मात्रांच्या निशाण्या केल्या आहेत त्याप्रमाणें वाजविण्यांत दीर्घ ऱ्हस्व अक्षरें ठेवावीं.

या गतीचा उपयोग विशेषें करून टप्पा गाण्याबरोबर होतो.

# रूपक तालाच्या गति.

## ताल एका ( मात्रा १२ )

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|
| धीं | धी | धा | तृ | क | तृ | ना |
| १ | १ | १ | ॥ | ॥ | १ | १ |
| = | | — | | | ० | |

| ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
|---|---|---|---|---|---|---|
| क | त्ता | धीं | तृ | क | धीं | ना |
| १ | १ | १ | ॥ | ॥ | १ | १ |
| — | | — | | | ० | |

या गतीची सम पहिल्या धींवर आहे आणि ४।५।११।१२ हीं अक्षरें अर्ध मात्रेचीं आहेत व बाकी अक्षरें एक मात्रेचीं आहेत. मिळून अक्षरें जरी चौदा आहेत, तरी मात्रा बाराच होतात.

या गतींत तालाचीं दोन आवर्तें होतात; तेव्हां एकदां गत वाजवून पुरी होते, ह्मणजे गतीचें एक आवर्त पुरें होतें. या तालाचा अर्थ ( पृ० पांचावर ) लिहिला आहे.

या गतीचा ताल शास्त्ररीत्या जरी असा आहे, तरी प्रचारांत चौताला प्रमाणेंच धरितात; व तसा ताल धरल्यानें गतीचें एकच आवर्त होतें.

| १ | २ | ३ | ४ | | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | | ११ | १२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| धीं | धी | धा | तृ | क | तृ | ना | क | त्ता | धी | तृ | क | धीं | ना |
| = | ० | | | | — | | ० | | — | | | — | |

ही गत ख्याल किंवा पदें ह्मणतांना वाजविण्याचा विशेषें करून उपयोग होतो.

# दुसरा पर्याय.

## दादरा.

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|---|
| धी | ग | ना | ना | तु | ना |
| १॥ | ॥ | १ | १ | १ | १ |
| = | | — | | ० | |

या गतीचा उपयोग दादरा ह्मणून हिंदुस्थानी कविता आहे तिचे बरोबर वाजविण्यांत विशेषें करून होतो.

## तिस्र जाती त्रिपुट तालाच्या निशाण्या.

१
० ० ०

ह्यांत एक द्रुतविराम, ह्मणजे तीन मात्रा व दोन द्रुत मिळून चार मात्रा; अशा एकंदर सात मात्रा आहेत याची सम द्रुतविराम याजवर आहे; परंतु कोणतेही ठिकाणीं ठेविली तरी चिंता नाहीं.

## झुमऱ्याची गत. ( मात्रा १४ )

१
२

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| धा | तृ | क | धीं | धीं | धा | गी | तृ | क | धीं |
| ॥ | ॥ | ॥ | १ | १ | ॥ | ॥ | ॥ | ॥ | १॥ |
| ‿ | | | — | | | | | | = |

एकूण मा० ७.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० |
| ना | नृ | क | धीं | धीं | धा | गी | तृ | क | तीं |
| ॥ | ॥ | ॥ | १ | १ | ॥ | ॥ | ॥ | ॥ | १॥ |

एकूण मा० ७.

या गतीचे दोन भाग कंसामध्यें निराळे दाखविले आहेत व प्रत्येक भागांत दाहा अक्षरें आहेत, तीं सर्व मिळून मात्रा सातच आहेत. याची सम पहिल्या भागांतील शेवटलें अक्षर धीं याजवर आहे.

या गतीचा पहिला ठोका अक्षर चार, दुसरा अथवा समेचा, अक्षर दाहा, तिसरा, अक्षर चोदा व काल अथवा ठोका सोडणें, विसावें अक्षर तीं याजवर आहे.

वर निम्नजातीच्या त्रिपुटतालाच्या निशाण्या दाखवून अर्थ लिहिला आहे; त्याचीं या गतींत दोन आवर्तें होतात ही गत ख्यालावरोवर वाजवितात.

## गत धमार ( मात्रा १४ )

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क | धी | न | धी | न | धा | ऽ | क | धी | न | ती | न | ता | ऽ |
| १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |

याची सम पहिल्या कवर आहे. धमार ह्मणून एक कविता आहे तिच्याबरोबर ही गत वाजवितात. या गतीखालीं तालांच्या निशाण्या केल्या आहेत त्यांजवरून पाहातांना कांहीं चमत्कारिक तऱ्हा ठेविली आहे, परंतु हा ताल संबधं

म्हणण्याच्या वेळेस कधीं कधीं उपयोगी पडतो; त्यावेळेस याचा ताल सारख्या रीतीचा असतो, तो असाः—

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| क | धीं | न | धीं | न | धा | ऽ | क | धीं | न | तीं | न | ना | ऽ |
| १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| | — | | — | | = | | | — | | — | | — | |

याची सम सहावें अक्षर धा यावर आहे. या गतींत तालांचा दोन अक्षरें होतात. वरच्या व या गतींत वाजविण्यांत कांहीं फेर नाहीं. फक्त ताल धरण्यांत फेर आहे.

क धीं न धीं न धा ऽ, क धीं न तीं न ना ऽ.

असे नकार वरील गतींत लिहिले गेले आहेत, त्या ठिकाणीं क धीं ट धीं ट धा ऽ, क धीं ट तीं ट ना ऽ असे म्हणण्याचा व वाजविण्याचा संप्रदाय आहे.

रूपकताल पृष्ठ सहा यांत लिहिला आहे तो व पृष्ठ २३ यांत रूपकतालाची गत लिहिली आहे. हा चतस्र जातीचा रूपकताल आहे व यासच एक्का म्हणतात व हल्लीं प्रचारांत खंडजातीच्या रूपकतालास मात्र रूपकताल म्हणतात.

## गत होरीची, बोल.

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ना | धीं | ऽ | ना | क | धीं | ऽ | ना | तीं | ऽ | ना | क | धीं | ऽ |
| १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| = | | | — | | | | ० | | | — | | | |

